**केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी प्रशिक्षण केंद्र, पुणेच्या नांव बदलाबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः शिप्रके-२०१५/ प्र.क्र.१४८/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई
तारीख: १९ ऑक्टोबर,२०१५.

**वाचा**

1) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः शिप्रके-२०१३/ प्र.क्र.२८२/ आरोग्य-४, दि.२१.११.२०१३.**
2) **उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे यांचे पत्र, क्रमांकः आसेप/ राशीसाप्रकें/ नावबदलशुद्धीपत्रक/ बोधचिन्ह/१२८०/२०१५, दि.१७.०७.२०१५.**

**प्रस्तावना**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन), पुणे या कार्यालयात सन १९८३ या वर्षापासून केंद्र शासनाच्या व युनिसेफच्या सहाय्याने शीतसाखळी उपकरणे देखभाल व दुरूस्ती प्रशिक्षण वर्ग भरविण्यात येतात. सदर शीतसाखळी प्रशिक्षण केंद्राकरीता दि.२१.११.२०१३ च्या शासन निर्णयान्वये नियामक मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. या केंद्रामध्ये शीतसाखळी उपकरणांच्या संबंधीचे विविध संशोधन, अभ्यास, मुल्यवर्धनाची व क्षमता वाढीकरीता काम केले जात असल्याने नियामक मंडळाच्या दिनांक २७.०२.२०१५ रोजी झालेल्या दुसऱ्या बैठकीमध्ये या प्रशिक्षण केंद्राचे नांव " राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र " ( National Cold Chain Resource Centre ) असे करण्याचा ठराव एकमताने घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे येथील कार्यालयाच्या परिसरात स्थित केंद्र शासन सहाय्यीत राष्ट्रीय शीतसाखळी प्रशिक्षण केंद्र, पुणे या प्रशिक्षण केंद्राचे नांव " राष्ट्रीय शीतसाखळी स्त्रोत केंद्र " ( National Cold Chain Resource Centre ) असे बदलण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१७१७२०५५८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.10.19 12:07:51 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व).
८. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
९. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
१०.सहसंचालक, आरोग्य सेवा ( सर्व ).
११.उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे ( सर्व ).
१२.उपसंचालक, आरोग्य सेवा ( परिवहन ), पुणे.
१३.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).